**संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सर्व लाभार्थ्यांच्या अर्थसहाय्यात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: विसयो-२०२२/प्र क्र. १२०/विसयो.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०५ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. विसयो २०१८/ प्र.क्र.६२/ विसयो, दिनांक २०.०८.२०१९,
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. विसयो-२०२०/ प्र.क्र.१००/ विसयो, दिनांक ०३.०५.२०२१.

**प्रस्तावना :-**

संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांना मिळणाऱ्या अर्थसहाय्यात वाढ करण्याबाबत मा. लोकप्रतिनिधी, विविध दिव्यांग संघटना व स्वयंसेवी संस्था यांच्या माध्यमातून शासनाकडे वारंवार मागणी व पाठपुरावा करण्यात येत होता. तसेच सन २०२३-२४ चा अर्थसंकल्प सादर करताना संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेतील पात्र लाभार्थ्यांच्या अर्थसहाय्यात रु.१०००/- वरुन रु.१५००/- इतकी वाढ करण्यात येत आहे, अशी घोषणा अर्थसंकल्पीय अधिवेशनात करण्यात आली होती. त्यानुषंगाने सदरहू योजनेतंर्गत पात्र लाभार्थ्यांना देण्यात येणाऱ्या अर्थसहाय्यात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने दिनांक २८ जून, २०२३ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता मिळाल्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेतील सर्व लाभार्थ्यांना देण्यात येत असलेल्या रुपये १०००/- इतक्या मासिक अर्थसहाय्यात रुपये ५००/- इतकी वाढ करुन अर्थसहाय्याची रक्कम दरमहा रुपये १५००/- करण्यास याद्वारे शासन मान्यता देत आहे. त्यानुसार १ अपत्य किंवा २ अपत्य असलेल्या विधवा लाभार्थ्यांना देखील अर्थसहाय्याची रक्कम दरमहा रु.१५००/- इतकी राहील.

२. विशेष सहाय्य योजनेतील लाभार्थ्यांना अर्थसहाय्याचे वितरण सर्वसाधारण / अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी करण्यात आलेल्या मंजूर तरतूदीमधून करण्यात यावा.

३. सदर अर्थसहाय्यात वाढ ही संजय गांधी निराधार अनुदान योजना, श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना, इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन व इंदिरा गांधी राष्ट्रीय दिव्यांग निवृत्तीवेतन योजना या योजनेतील सर्व लाभार्थ्यांना लागू होईल.

४. संदर्भाधीन शासन निर्णयात हयात-प्रमाणपत्राच्या तरतूदीमध्ये बदल करण्यात येत असून लाभार्थ्यांनी त्याच आर्थिक वर्षात हयात-प्रमाणपत्र सादर केल्यास लाभार्थ्याचे बंद केलेले अर्थसहाय्याचे वाटप पूर्ववत करण्यात यावे. तसेच संजय गांधी निराधार अनुदान योजनेतील लाभार्थ्याच्या मुलाला नोकरी मिळाल्यानंतर (शासकीय/ निमशासकीय/ खाजगी) मुलाचे व कुटूंबाचे उत्पन्न विचारात घेऊन लाभार्थ्याची पात्रता ठरविण्यात यावी. याबाबत

संदर्भ क्र.१ येथे नमूद दिनांक २० ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयातील लाभार्थ्यांच्या मुलाची २५ वर्ष वयाबाबतची अट रद्द करण्यात येत आहे.

५. उपरोक्त योजनांमधील सुधारणेपूर्वीच्या व सुधारणेनंतरच्या अर्थसहाय्याचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रात नमूद केला आहे.

६. सदरची अंमलबजावणी शासन निणर्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७०६११३७३८७५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: CN = PRASHANT PUNDLIK WAGH, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT
Date: 2023.07.06 11:42:39 +05'30'

**(प्रशान्त पुं. वाघ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
४) सर्व जिल्ह्यांचे पालक मंत्री,
५) सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
६) सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष,
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१०) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली,
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१२) संचालक, नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई,
१३) वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई,
१४) सर्व मंत्रालयीन विभाग/सर्व विभागीय आयुक्त /सर्व महापालिका आयुक्त/सर्व पोलीस आयुक्त
१५) सर्व जिल्हाधिकारी / सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक / सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९) विभागीय समाजकल्याण अधिकारी ( मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर)
२०) सर्व उप विभागीय अधिकारी/उप जिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी) / सर्व तहसिलदार,

२१) सर्व कोषागार अधिकारी / सर्व उप कोषागार अधिकारी,

२२) सर्व पंचायत समितीचे गट विकास अधिकारी,

२३) सर्व अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४) निवड नस्ती, विसयो.

शासन निर्णय, क्र.विसयो-२०२२/प्र.क्र.१२०/विसयो, दिनांक : ०५ जुलै, २०२३ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | योजना | केंद्र पुरस्कृत/ राज्य पुरस्कृत | वयोगट | लाभार्थ्यांना यापुर्वी असलेले अर्थसहाय्य | | | लाभार्थ्यांसाठी दि. ०५ जुलै, २०२३ च्या शासन निर्णयानुसार सुधारित अर्थसहाय्य | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण अर्थसहाय्य | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण अर्थसहाय्य |
| १ | संजय गांधी निराधार अनुदान योजना (सं.गां.नि.अ.यो.) | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ० | १००० | **१०००** | ० | १५०० | **१५००** |
| २ | श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (श्रा.बा.से.रा.नि.यो.) | राज्य पुरस्कृत | ६५ वर्षावरील | ० | १००० | **१०००** | ० | १५०० | **१५००** |
| ३ | इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षावरील (६५ ते ७९ वयोगट) | २०० | ८०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **१०००** | २०० | १३०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **१५००** |
| ४ | इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षावरील (८० व ८० वर्षावरील) | ५०० | ५०० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **१०००** | ५०० | १००० (श्रा.बा.से.रा.नि.यो.मधून) | **१५००** |
| ५ | इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ३०० | ७०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **१०००** | ३०० | १२०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **१५००** |
| ६ | इंदिरा गांधी राष्ट्रीय दिव्यांग निवृत्तीवेतन योजना | केंद्र पुरस्कृत | ६५ वर्षाखालील | ३०० | ७०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **१०००** | ३०० | १२०० (सं.गां.नि.अ.यो.मधून) | **१५००** |

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: CN = PRASHANT PUNDLIK WAGH, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT
Date: 2023.07.06 11:42:55 +05'30'

( प्रशान्त पुं. वाघ )

कार्यासन अधिकारी ,महाराष्ट्र शासन